खेलो इंडिया युथ गेम्स-२०२० मधील विजेत्या खेळाडूंना बक्षिस रक्कम तसेच सन्मान सोहळा कर्यक्रमाकरीता निधी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०२०/प्र.क्र. ३१/ क्रीयुसे-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख : १३ फेब्रुवारी, २०२० .

वाचा :-

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, केआयपी-२३१८/ प्र.क्र. १९७/क्रीयुसे-१, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१८.

२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक खेयुक्री/ पविपा/२०१९-२०/ का-४, दि. २२/१/२०२०

प्रस्तावना:-

खेलो इंडिया - क्रीडा विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम” ही केंद्र पुरस्कृत योजना दिनांक १६/१०/२०१७ च्या परिपत्रकान्वये संपूर्ण देशात लागू केली. सदर योजनेनुसार, युवा खेळाडूंकरीता वार्षिक खेळाच्या स्पर्धांचे आयोजन करण्यात येते. त्यानुसार, दि. ९ ते २१ जानेवारी, २०२० या कालावधीत गुवाहाटी, आसाम येथे तिसऱ्या खेलो इंडिया युवा स्पर्धेचे आयोजन करण्यात आले होते. या स्पर्धेत महाराष्ट्र राज्याच्या संघाने ७८ सुवर्ण, ७७ रौप्य व १०१ कांस्य अशी एकूण २५६ पदके संपादन करून पदक तक्त्यामध्ये देशातील सर्व राज्यांमध्ये प्रथम क्रमांक संपादन केलेला आहे.

२. गतवर्षीप्रमाणे, या वर्षीच्या खेलो इंडीया युवा स्पर्धा-२०२० स्पर्धेतील सुवर्ण पदक विजेत्यांना रु. १,००,०००/-, रौप्य पदक विजेत्यांना रु. ७५,०००/- व कास्य पदक विजेत्यांना रु. ५०,०००/- याप्रमाणे रोख पारितोषिक आणि सन्मानचिन्ह देण्यासाठी, तसेच क्रीडा मार्गदर्शक व व्यवस्थापक यांना सन्मानचिन्ह प्रदान करण्यासाठी सन्मान सोहळा आयोजित करण्याचे आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र. २ अन्वये प्रस्तावित केलेले आहे.

३. सदरहू स्पर्धेतील खेळाडूंना रोख पारितोषिक व सन्मानचिन्ह तसेच क्रीडा मार्गदर्शक व व्यवस्थापक यांना सन्मानचिन्ह प्रदान करण्यासाठी आयोजित करण्यात येणाऱ्या सन्मान सोहळयाकरीता ( प्रवास खर्च, अल्पोपहार खर्च + भोजन व सादिल खर्च ) एकूण रु. ३,२६,२०,०००/- इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार, रोख पारितोषिक व सन्मानचिन्ह प्रदान करण्याकरीता सन्मान सोहळा आयोजित करण्यासाठी येणाऱ्या खर्चाकरीता निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दि. ९ ते २१ जानेवारी, २०२० या कालावधीत गुवाहाटी, आसाम येथे आयोजित तिसऱ्या खेलो इंडिया युवा स्पर्धेमध्ये २०२० स्पर्धेतील पदक प्राप्त खेळाडूंना रोख पारितोषिक व सन्मानचिन्ह तसेच क्रीडा मार्गदर्शक व व्यवस्थापक यांना सन्मानचिन्ह प्रदान करण्याकरीता आयोजित करण्यात येणाऱ्या सन्मान सोहळयाकरीता, खालील विवरणपत्रामध्ये दर्शविलेल्या बाबीसाठी रु. ३,२६,२०,०००/- (रुपये तीन कोटी सव्वीस लक्ष वीस हजार फक्त ) एवढी तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी सन २०१९-२० या आर्थिक वर्षात "ऑलिंम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिके देणे" या योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

***खर्चाच्या बाबी***

| अ.क्र. | खर्चाची बाब | रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | खेलो इंडिया युथ गेम्स-२०२० मधील पदक विजेते खेळाडूंकरीता रोख रक्कमेचे पारितोषिक देण्याकरीता निधी वितरीत करणे | रु. २,९५,७५,०००/- |
| २ | खेलो इंडिया युथ गेम्स-२०२० मधील पदक विजेते खेळाडू, संघव्यवस्थापक व क्रीडा मार्गदर्शक यांचेकरीता सन्मान चिन्ह तसेच सन्मान सोहळयामधील इतर बाबीवरील खर्चासाठी निधी वितरीत करणे | रु. ३०,४५,०००/- |
| | एकूण (१ + २) | रु. ३,२६,२०,०००/- |

२. सन २०१९-२० या आर्थिक वर्षात, ऑलिंम्पिक, राष्ट्रकुल व आशियाई स्पर्धांमधील पदक विजेत्यांना रोख पारितोषिके देणे या योजनेकरीता उपलब्ध तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याच वेळी आंहरीत करण्यात यावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय /वित्तीय नियमावली यातील तरतूदीनुसार वरील निधीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. या संदर्भात होणारा खर्च ""मागणी क्र. ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा, (०९)(०६) ऑलिम्पिक, राष्ट्रकुल आणि आशिया खेळामध्ये पदके मिळविणाऱ्या क्रीडापटुंना रोख पारितोषिके

(कार्यक्रम) (२२०४ ५३२१)- ५०, इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक ८ जुलै, २०१९ व २२ जानेवारी, २०२० च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त निधी खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दिनांक ८ जुलै, २०१९ व २२ जानेवारी, २०२० च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१३१५४१३७६५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e97 00fe62cba2439a81b4be4, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2020.02.13 15:44:10 +05'30'

**( स्वा.म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
५. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
९. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
१०. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (संचालनालयामार्फत )
१२. सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
१३. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१४. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१५. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. कार्यासन क्रीयुसे-२ व क्रीयुसे-३
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१)